20100331204853001

**PRIASoft या Web Based Online संगणकीय आज्ञावलीच्या माध्यमातून सुधारीत नमुन्यामध्ये स्थानिक स्वराज्य संस्थांचे लेखे ठेवण्याबाबत.. ....**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व पंचायत राज विभाग,
शासन निर्णय क्रमांक एविले 2009 / प्रक्र 72 / वित्त-6
मंत्रालय, मुंबई-400 032
दिनांक :-**30 मार्च, 2010.**

वाचा : 1) ग्राम विकास शासन परिपत्रक क्र.संकीर्ण 2003/प्र.क्र.185/वित्त-4, दि.10 नोव्हेंबर,2003
2) ग्राम विकास क्र.संकीर्ण 2009/प्र.क्र.62/वित्त-6, दि.20.7.2009चे पत्र.
3) श्री. ए.एन.पी. सिन्हा , सचिव, पंचायत राज मंत्रालय, नवी दिल्ली यांचे D.O.No.M-11011/ 54/2009-P & C (AR), दि.2 ऑक्टोबर, 2009.
4) 13 वा वित्त आयोग (स्थानिक संस्था) परि.क्र.10.160

प्रस्तावना :-

राज्यातील पंचायत राज संस्थांना म्हणजे जिल्हा परिषद / पंचायत समिती / ग्राम पंचायत यांना मोठया प्रमाणावर केंद्र शासनाचा व राज्य शासनाचा विकास निधी उपलब्ध होत आहे. केंद्र / राज्य शासनामार्फत प्राप्त होणाऱ्या निधीच्या लेख्यांचे सुसूत्रीकरण करण्यासाठी पंचायत राज मंत्रालयाने भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या शिफारशीनूसार मासीक / वार्षीक लेख्यांचे सुधारीत नमूने तयार केले आहेत. या लेख्यांचे संगणकीकरण करण्याच्या हेतूने राष्ट्रिय सुचना व विज्ञान केंद्र नवी दिल्ली यांच्या सहकार्याने Panchayat Raj Institution Accounting Software म्हणजेच PRIASoft ही Internet वर आधारीत Web Based Online संगणकीय आज्ञावली विकसीत केली आहे. सचिव पंचायत राज मंत्रालय नवी दिल्ली यांच्या वरिल संदर्भीय पत्र क्रमांक 3 नुसार निर्देशीत केल्याप्रमाणे देशातील संपूर्ण राज्यांमध्ये PRIASoft च्या माध्यमातून सुधारीत नमुन्यातील लेखांकनाचा स्विकार करणे अभिप्रेत आहे. त्यानुसार राज्यातील पंचायत राज संस्थांना म्हणजे जिल्हा परिषद / पंचायत समिती / ग्राम पंचायत या Software च्या माध्यमातून मासीक लेखे तयार करणे व वार्षिक लेखे मुख्य लेखा परीक्षक (म.रा.) स्थानिक निधी लेखा यांचेकडून प्रमाणित करुन घेऊन जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी राज्य शासनास सादर करणेबाबत आदेशीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीच्या अहवालानूसार राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी म्हणजेच जिल्हा परिषद / पंचायत समिती व ग्राम पंचायत यांनी PRIASoft च्या माध्यमातून लेखांकन करावे असा शासनाने निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

1. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी म्हणजे जिल्हा परिषद / पंचायत समिती / ग्राम पंचायत यांनी महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती अधिनियम 1961 व मुंबई ग्राम पंचायत अधिनियम 1958 मधील तरतूदीप्रमाणे महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती लेखासंहीता 1968 मध्ये निर्धारीत केलेल्या मासीक व वार्षीक लेख्यांबद्दल Panchayat Raj Institution Accounting Software म्हणजेच PRIASoft या Internet वर आधारीत Web Based Online संगणकीय आज्ञावलीमधील नमुन्यांप्रमाणे आज्ञावलीच्या माध्यमातून जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत यांचे वार्षिक लेखे तयार करावेत. या आज्ञावलीमध्ये नियमीतपणे लेखांकन करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहिल. जिल्हा परिषद व पंचायत समिती चे वार्षिक लेखे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी तयार करुन मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा यांचेकडून प्रमाणित करुन विहित मुदतीत जिल्हा परिषदांच्या मान्यतेने शासनास सादर करावेत आणि वार्षिक लेखे राजपत्रात प्रसिध्द करावेत. याबाबतच्या लेखा संहितेतील तरतूदीचे पालन करावे.

2. हे आदेश दिनांक 1 एप्रिल 2010 पासून अंमलात येतील.

3. महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती अधिनियम 1961 व मुंबई ग्राम पंचायत अधिनियम 1958 मधील तरतूदीप्रमाणे महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती लेखासंहीता 1968 मध्ये आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

30.03.10

**(एकनाथ मोरे )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

प्रति,
नियंत्रक व महालेखा परिक्षक , नवी दिल्ली.
सचिव, पंचायत राज मंत्रालय, कृषी भवन, नवी दिल्ली.
प्रधान लेखानियंत्रक , नवी दिल्ली.
NIC , नवी दिल्ली.
प्रधान महालेखापाल-1 (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-2 (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मंत्री (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा)
मंत्रालयीन सर्व विभाग
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोंकण भवन, नवी मुंबई
सह मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर
उपमुख्य लेखा परिक्षक सर्व
सर्व विभागीय आयुक्त
सहसंचालक , ऑल इंडिया इंस्टीटयूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई
NIC, मुंबई
जिल्हा सुचना व विज्ञान अधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, (सर्व)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
उप मुख्य कार्यकारी अधिकारी , पंचायत जिल्हा परिषद (सर्व)
गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
कोषागार अधिकारी (सर्व)